**महिला आर्थिक विकास महामंडळ सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी भाग- भांडवली अंशदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माविम २०१४/प्र.क्र. १२६/का-१०**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १० मार्च, २०१५

**शासन निर्णय:-**

सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात ४२३५-०१३५ ह्या लेखाशिर्षाखाली ₹९५.९० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. सदर तरतुदीपैकी ६०% निधीच्या मर्यादेतील ₹५७,५४,०००/-(अक्षरी ₹ सत्तावन लक्ष चौपन्न हजार फक्त) इतकी तरतुद भागभांडवली- अंशदान म्हणून सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम(, मुंबई यांस वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देत आहे. सदर निधीमधून महिला आर्थिक विकास महामंडळाने सावली वसतीगृह इमारतीची पुनर्बांधणी करावी.

२. याकरिता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कम अधिदान व लेखा कार्यालयातून आहरित करुन महिला आर्थिक विकास महामंडळाला प्रदान करावी. वितरित करण्यात आलेला निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी घातलेल्या अटी, शर्ती, नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता महिला आर्थिक विकास महामंडळाने घ्यावी. तसेच वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. ज्या प्रयोजनासाठी माविमला भागभांडवली- अंशदान मंजूर केले आहे त्याच कारणासाठी माविमने सदर निधीचा विनियोग करावा.

४. यावरील खर्च मागणी क्रमांक एक्स-३-४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूकापंचवार्षिक- योजनांतर्गत योजनाराज्य- योजनांतर्गत योजना)-००)(०१) महिला आर्थिक विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (४२३५ ०१३ ५) ३२-अंशदाने या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व चालू वित्तीय वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागवावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०१/व्यय-६, दिनांक २०.२.२०१५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११०३८४७१२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: CN = Mahendra Babusing Hajari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 15:27:57 +05'30'

**म.बा.हजारी**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल १/२ ( लेखा परीक्षा )/(लेखा व अनुज्ञेयता(, मुंबईनागपूर/,
४. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. वित्त विभाग (का-व्यय.६/ सा(.उ., मंत्रालय, मुंबई,
७. नियोजन विभाग (का.१४१५), मंत्रालय, मुंबई,
८. सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. कार्यासन-०४, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.निवड नस्ती (का.१०)